सैन्यातील धारातीर्थी पडलेल्या महाराष्ट्रातील अधिकारी/जवान यांच्या विधवा/अवलंबितांना तसेच अपंगत्व प्राप्त झालेल्या अधिकारी व जवानांना आर्थिक मदत देण्याबाबत- अपंगत्व प्राप्त जवान हवलदार शेंडकर रावसाहेब शिवाजी, जि. अहमदनगर.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मासैम-२०१९/प्र.क्र.४३१/२८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २४.१२.२०१९

वाचा-

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक मासैम २०१६/ प्र.क्र. ९२(१)/२०१६/२८, दिनांक ३०/११/२०१६
२) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्र.१६०१९/प्रस्ताव/सैकवि-१६, दि. १४/११/२०१९.

शासन निर्णय-

युध्दात, युध्दजन्य परिस्थितीमध्ये, तसेच देशातील सुरक्षा संबंधी मोहिमेत, चकमकीत / देशाबाहेरील मोहिमेत धारातीर्थी पडलेल्या सैनिकांच्या वारसांना/अपंगत्व आलेल्या सैनिकांना/तसेच देशातील सुरक्षा संबंधी मोहिमेत, चकमकीत धारातीर्थी पडलेल्या सीमा सुरक्षा बल व इतर तत्सम निमलष्कर दलातील अधिकारी /जवानांच्या विधवांना/ कुटुंबियांना संदर्भाधिन दिनांक ३०.११.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये १ एप्रिल, २०१६ पासून पुढील ५ वर्षात देण्यात येणारी आर्थिक मदत अपंगत्वाच्या प्रमाणानुसार ज्या घटनेमध्ये जवानास अपंगत्व प्राप्त झाले, ती घटना ज्या वर्षात घडली आहे /घडेल/ ते वर्ष १) अपंगत्वाचे प्रमाण २०% ते ४९% असल्यास सन २०१८-१९ मध्ये रु. १.७५ लक्ष २) अपंगत्वाचे प्रमाण ५०% किंवा त्यापेक्षा जास्त असल्यास सन २०१७-१८ मध्ये रु ५.०० लक्ष इतकी आर्थिक मदत अनुज्ञेय आहे.

त्यानुसार सैनिक कल्याण विभागाने दिनांक १४/११/२०१९ च्या पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने, पुढील तक्त्यात नमूद केल्यानुसार अपंगत्व प्राप्त महाराष्ट्र राज्यातील जवानांना आर्थिक मदत देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे:-

| अ. क्र. | नाव व पत्ता | अपंगत्व प्राप्त दिनांक, मोहिम व ठिकाण | रक्कम रुपये |
|---|---|---|---|
| १ | नं.२७९६३१७- एच, हवलदार शेंडकर रावसाहेब शिवाजी , ४ MLI, PIN- ९११६०४, C/o ५६ APO. | ३० सप्टेंबर , २०१८<br>पूंछ सेक्टर, नियंत्रण रेषेजवळ, जम्मू काश्मिर (ऑपरेशन रक्षक) | रु. ५,००,००० |
| | | **एकूण** | रु. ५,००,००० |

२. अपंगत्व प्राप्त जवानांना रु. ५,००,०००/- (रुपये पाच लाख फक्त) इतकी अर्थिक मदत प्रदान करण्यात येत असून या रु. ५,००,०००/- (रुपये पाच लाख फक्त) रक्कमेपैकी २० % म्हणजे रु.१,००,०००/- (रुपये एक लाख फक्त) शासकीय अनुदानातून तर उर्वरित ८० % रक्कम म्हणजे रु. ४,००,०००/-

(रुपये चार लाख फक्त) मुख्यमंत्री सहायता (कारगिल ) निधीतून घेण्यात आलेल्या व राष्ट्रीयकृत बँकेत नोव्हेंबर, २०१९ पर्यंत गुंतविण्यात आलेल्या रकमेच्या व्याजातून अदा करण्यात यावी.

३. वरील परिच्छेद क्र. २ मध्ये नमूद शासन अनुदानातून द्यावयाच्या रक्कमेपोटी होणारा खर्च रुपये १,००,०००/- (रुपये एक लाख फक्त) हा मागणी क्र. ए-५ लेखाशीर्ष " २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०-इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, १०२- सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृत्तीवेतने, (००)(०४) देशांतर्गत सुक्षासंबंधी मोहिमेत-चकमकीत धारातीर्थी पडलेल्या जवानांच्या विधवांना/अवलंबितांना तसेच अपंगत्व प्राप्त जवानांना आर्थिक मदत (२२३५२६०८) ५० - इतर खर्च " या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० या वित्तीय वर्षाकरीता मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. प्रस्तुत प्रकरणी 'आहरण व संवितरण अधिकारी', म्हणून जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, अहमदनगर यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर आर्थिक मदत ECS द्वारे देण्यात यावी व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित केलेल्या शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक ३०.११.२०१६ मधील मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२३०१५०६०३१२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Mahadeo Khade

Digitally signed by Suresh Mahadeo Khade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=14c299447f4a6e6c33ab3f7a85fbf010628981e82f8311a81d1cf974681485c2, serialNumber=f0b4c833a6fc7c6fb7cb0a96a3e2bb79d42d283b8f0f7bfc1ae95298d60bacf1, cn=Suresh Mahadeo Khade
Date: 2019.12.30 15:16:30 +05'30'

( सु. म. खाडे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
३. महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र, मुंबई-३२
४. कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,
५. जिल्हाधिकारी, अहमदनगर,
६. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर,
७. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे ४११ ००६ ( ५ प्रती),
८. जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, अहमदनगर,
९. सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई - ३२,
१०. शेंडकर रावसाहेब शिवाजी ,४ MLI, PIN- ९११६०४, C/o ५६ APO.
११. निवड नस्ती (२ प्रती).